# सशाने फक्त ऐकले !

लेखन : कोरी डोएरफेल्ड

भाषांतर : पल्लवी सतीश पाटील



एके दिवशी टेलर ने काहीतरी भन्नाट करायचे ठरवले



काहीतरी नवीन!



काहीतरी
वेगळं...



काहीतरी आलीशान

टेलर ने उभ्या केलेल्या महालाचा त्याला खूप अभिमान वाटला.





पण एवढ्यातच ...

त्याने उभा केलेला उंच महाल पापणी लवताच जमिनोदस्त झाला होता





जवळ उभ्या असलेल्या कोंबडीने हे पाहिले.





"कूकड्र-कू! कूकड्र-कू! किती वाईट झालं

खरंच खूप वाईट झालं! मला जे झालं त्याबद्दल खेद आहे.”



पण टेलर ला  प्रत्युत्तर द्यायची इच्छा नाही झाली.

शेवटी कोंबडी शांततेत निघून गेली.



"मला सांग बरं हे असं कसं काय झालं?

आपण याबद्दल सविस्तर बोलूयात.

कूकड्र-कू! कूकड्र-कू!"





त्यानंतर आले अस्वल !

“अरेरे! हे किती भयानक झालं !

मला  माहिती आहे तुला नक्कीच राग आला असणार !

राग येणं साहजिक आहे.



चल आपण दोघे जोर-जोरात ओरडून राग व्यक्त करूयात...

गररर! गररर! ग्रारर!”



पण टेलर ला राग व्यक्त
करण्याची, ओरडायची
अजिबात इच्छा नाही झाली.



त्यामुळे अस्वल देखील माघारी निघून गेले.



हत्तीला माहिती होते की त्याला नेमकं काय करायचं आहे !

"ट्रम्पा-दा! मी हा महाल लगेच नीट करून देऊ शकतो.

पण तुला आठवतंय का, की आधी महाल हुबेहूब कसा दिसत होता?”





पण आधी त्याने बांधलेला महाल
कसा दिसत होता, हे आठवायची
सुद्धा टेलर ला इच्छा झाली नाही .

त्यामुळे हत्ती पण निघून गेला.



त्यानंतर अन्य प्राणीही आले.

लांडगा म्हणाला,
"ही:ही:ही:!
सोडून दे ना !
अश्या गोष्टी हसून सोडून
द्यायच्या असतात. “



शहामृग: "गल्प!

चल आपण लपाछपी खेळुयात आणि
विसरून जाऊयात की असं काही कधी
घडलंही होतं !”



कांगारू: "नॉक-नॉक!

इश्श.... इथे किती पसारा आहे!

चल हे सगळं आवरून गोळा करून

ठेवूयात “



आणि साप म्हणाला, " हिस्सस्स....

चल जाऊन दुसऱ्या कुणाचा तरी महाल पाडूयात ! खूप मज्जा येईल !"



पण टेलर ला कुणासोबतही काहीही करण्याची इच्छा झाली नाही.

त्यामुळे सगळे एकामागोमाग आले आणि तसेच परत गेले...



शेवटी टेलर एकटाच राहिला.







त्या सुन्न करणाऱ्या शांततेत, त्याचे जवळ उभ्या असलेल्या सस्याकडे लक्षच  गेले नाही...

पण ससा मात्र हळू-हळू त्याच्या जवळ येऊ लागला.

तो टेलर ला चिकटून फक्त शांत बसून राहिला.



टेलर ला सस्याच्या मऊ केसांची मायेची उब जाणवली.





ते दोघे शांतपणे एकमेकांजवळ खूप वेळ बसून राहिले.

शेवटी कसेबसे टेलर च्या तोंडून शब्द फुटले,

" तू असाच माझ्या जवळ बसून रहा प्लिज"



सशाने त्याचे म्हणणे ऐकले.



त्याने टेलर चे ओरडणे-रागावणे  शांतपणे ऐकले.



सशाने टेलर ने व्यक्त केलेल्या आठवणी ऐकल्या…



जेव्हा टेलर हसला तेव्हा ससा देखील हसला.



सशाने टेलर ची लपायची
आयडिया पण ऐकली....



सर्व काही गोळा करून बंद करून ठेवण्याची  गोष्ट
पण ऐकली...



दुसऱ्या कुणाचातरी महाल बर्बाद करायचा विचार ही
ऐकून घेतला.



या सर्व गोष्टी चालू होत्या तेव्हा ससा कुठेही निघून नाही गेला.

तो फक्त शांतपणे टेलर च्या जवळ बसून होता. त्याची साथ देत होता.



आणि काही वेळानंतर,

टेलर ने पुन्हा नव्याने महाल उभा करण्याची इच्छा व्यक्त केली.

" मला आता एक क्षण ही वाया नाही घालवायचा" टेलर उत्साहाने म्हणाला. “



"आता काहीतरी भन्नाट बनेल!",
तो आनंदाने उड्या मारत म्हणाला.



अंत